**विदर्भ प्रादेशिक विभागांतर्गत अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, नागपूर हे कार्यालय वर्गीकरणाने/ स्थलांतरणाने स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्रमांक-आढावा-२००९/(१२६/२००९)/निवसं-३/आ.(प्रशि)

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक : २४ जुलै,२००९.

**प्रस्तावना :-**

विदर्भातील गोसीखुर्द या सर्वात मोठया प्रकल्पास केंद्र शासनाकडून राष्ट्रीय प्रकल्पाचा दर्जा प्राप्त झाला आहे. राष्ट्रीय प्रकल्पाचा दर्जा मिळाल्यामुळे प्रकल्पाची कामे वेगाने सुरु आहेत. या शिवाय विदर्भ प्रादेशिक विभागांतर्गत सिंचनाचा मोठया प्रमाणावर अनुशेष असून सदर अनुशेष दूर करण्यासाठी निधीची उपलब्धता देखील करुन देण्यात येत आहे. त्यामुळे विदर्भ् प्रादेशिक विभागांतर्गत मोठया प्रमाणावर कामे सुरु झालेली आहेत. सदर कामे ही गुणवत्ता पूर्वक व्हावीत या दृष्टीने या कामांची काटेकोर तपासणी होणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे गोसीखुर्द प्रकल्पास राष्ट्रीय प्रकल्पाचा दर्जा देताना गोसीखुर्द प्रकल्पांतर्गत कामांची गुणवत्ता तपासणीसाठी स्वतंत्र गुणनियंत्रण यंत्रणा कार्यान्वित करण्यात यावी ही अट देखील घालण्यात आली आहे. त्याचबरोबर विदर्भातील अन्य कामांचा आढावा घेतला असता नागपूर येथे एक स्वतंत्र **गुण नियंत्रण मंडळ** कार्यालय कार्यान्वीत करणे आवश्यक असल्याचे दिसून आले.

सद्यस्थितीत विदर्भ प्रादेशिक क्षेत्रातंर्गत गुण नियंत्रणाची कामे अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद यांच्याकडून करण्यात येतात. अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद या मंडळ कार्यालयाचे कार्यक्षेत्र औरंगाबाद (मराठवाडा), नाशिक (उत्तर महाराष्ट्र व खान्देश), विदर्भातील अमरावती व नागपूर या ४ महसूली विभागातील २४ जिल्हयात आहे. अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद अंतर्गत गुण नियंत्रण विभाग, नांदेड / अमरावती / नागपूर / धुळे हे ४ विभाग कार्यरत आहेत. अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद या मंडळ कार्यालयाकडे २० मोठे, ४५ मध्यम, उपसा सिंचन योजना व ११३ लघु प्रकल्प असे एकूण १९० प्रकल्पांच्या गुणनियंत्रणाचे काम असून जलक्षेत्र सुधार प्रकल्पाअंतर्गत ४९७३७६ हेक्टर लाभक्षेत्रामध्ये २०२ गुणनियंत्रणाची कामे करावी लागणार आहेत. हयात आणखी वाढ होणे अपेक्षित आहे.

वर विशद केल्यानुसार औरंगाबाद गुण नियंत्रणाच्या कामाच्या व्याप्तीचा विचार करता विदर्भ प्रादेशिक क्षेत्राकरीता स्वतंत्र गुण नियंत्रण कार्यालय असणे आवश्यक आहे. या दृष्टीने शासनाकडील अन्य अतिरिक्त ठरणारी कार्यालये फिरवाफिरवीने/स्थलांतरणाने वर्ग करून **मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प, पुणे** यांचे नियंत्रणाखाली नागपूर येथे **अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, नागपूर** हे मंडळ कार्यालय व सदर मंडळ कार्यालयाच्या अधिपत्याखाली **गुण नियंत्रण विभाग** व या प्रत्येक विभागाखाली **उपविभाग** वर्गीकरणाने/स्थलांतरणाने उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

वर प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार नागपूर येथे **अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, नागपूर** हे मंडळ नव्याने स्थापन करावयाच्या मंडळ कार्यालयासाठी **अधीक्षक अभियंता, घाटघर जलविद्युत प्रकल्प मंडळ, नाशिक** हे कार्यालय वर्ग करण्यात येत आहे. या वर्गीकरणानंतर अधीक्षक अभियंता गुण नियंत्रण मंडळ, नागपूर या कार्यालयाचे अधिपत्याखाली **(१) कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, अमरावती, (२) कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, नागपूर, (३) कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, वाही (पवनी) व (४) कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, अकोला हे ४ विभाग व १७ उपविभाग कार्यरत राहतील.**

२. **अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, नागपूर** अंतर्गत **कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, अमरावती,** व **कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, नागपूर** या दोन विभागांसाठी **अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद** अंतर्गत सध्या आस्तित्वात असलेल्या ४ विभागांपैकी **कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, अमरावती** व **कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, नागपूर** हे २ विभाग उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. उर्वरित **कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, धुळे** व **कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, नांदेड** ही कार्यालये **अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद** या कार्यालयाच्या अधिपत्याखालीच कार्यरत राहतील.

३. **कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, वाही (पवनी)** साठी **अधीक्षक अभियंता, घाटघर जलविद्युत प्रकल्प मंडळ, नाशिक** अंतर्गत सध्या कार्यरत असलेल्या ३ विभागांपैकी **कार्यकारी अभियंता, घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प विभाग क्र.२, चोंढे** हा विभाग वर्गीकरणाने उपलब्ध करुन देण्यात येत आहे. उर्वरित दोन विभाग म्हणजेच **कार्यकारी अभियंता, घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प विभाग क्र.३, शहापूर** व **कार्यकारी अभियंता, नर्मदा विकास विभाग, नंदुरबार हे दोन विभाग** त्याखालील उपविभागासह **अधीक्षक अभियंता, कोयना बांधकाम मंडळ, सातारा** या कार्यालयाच्या अधिपत्याखाली जोडण्यात येत आहे.

४. **कार्यकारी अभियंता, गुण नियंत्रण विभाग, अकोला** या विभागासाठी **अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर** अंतर्गत सध्या आस्तित्वात असलेला **कार्यकारी अभियंता, मध्यम प्रकल्प विभाग, अहमदनगर** हा विभाग वर्गीकरणाने उपलब्ध करुन देण्यात येत आहे. **कार्यकारी अभियंता, गुणनियंत्रण विभाग, अकोला** अंतर्गत ५ उपविभाग प्रस्तावित करण्यात आलेले आहेत.त्यापैकी **कार्यकारी अभियंता, गुणनियंत्रण उपविभाग, नांदुरा** यासाठी सध्या उपविभाग उपलब्ध नसल्याने **यथावकाश उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला अंतर्गत अकोला पाटबंधारे विभाग, अकोला अंतर्गत मृद परिक्षण उपविभाग, अकोला या नांवाने कार्यरत असलेला उपविभाग गुण नियंत्रण विभाग, अकोला साठी वर्गीकरणाने उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

२. **अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर** अंतर्गत सध्या आस्तित्वात असलेला **कार्यकारी अभियंता, मध्यम प्रकल्प विभाग, अहमदनगर** हा विभाग **अधिपत्याखालील तीन उपविभागासह** वर्गीकरणाने उपलब्ध करुन देण्यात येत आहे. **त्यामुळे मध्यम प्रकल्प विभाग, अहमदनगर या विभागाचे कामकाज लघु पाटबंधारे विभाग क्र.२, संगमनेर या विभागाकडे सोपविण्यात येत आहे. मध्यम प्रकल्प विभाग, अहमदनगर या विभागाच्या अधिपत्याखालील तीन उप विभागांचे कामकाज कोणत्या उप विभागांकडे सोपविण्यात यावे याबाबतचा निर्णय कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांनी घ्यावा.**

३. अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, नागपूर या नव्याने स्थापन करण्यात येणाऱ्या मंडळ कार्यालयाचे अधिपत्याखालील ४ विभाग व १७ उपविभाग यांचा तपशिल या शासन निर्णयासोबतच्या **प्रपत्रा** प्रमाणे राहील.

७. **अधीक्षक अभियंता तथा परिमंडळीय अधिकारी, घाटघर जलविद्युत प्रकल्प मंडळ, नाशिक** हे परिमंडळ कार्यालय नागपूर येथे वर्ग करण्यात येत असल्याने सदर कार्यालयातील परिमंडळाच्या कामकाजाशी संबधित असलेली एकूण ५ मंजूर पदे ही त्यावरील कार्यरत कर्मचाऱ्यांसह **अधीक्षक अभियंता (दरवाजे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक** या कार्यालयाकडे वर्ग करण्यात येत आहेत. तसेच अधीक्षक अभियंता (दरवाजे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक यांना नाशिक परिमंडळाच्या कामकाजासाठी परिमंडळीय अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यानुसार परिमंडळाशी संबधित सर्व दस्तऐवज व कागदपत्रे अधीक्षक अभियंता (दरवाजे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक **यांनी प्राप्त करुन घ्यावीत व परिमंडळीय अधिकारी म्हणून कामकाज पहावे.**

८. **अधीक्षक अभियंता गुण नियंत्रण मंडळ, नागपूर** या व इतर नवीन कार्यालयांसाठी जागा व अन्य आस्थापनाविषयक अनुषंगीक बाबी पुरविण्याची जबाबदारी कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांची राहील.

९.	वरील कार्यालये सध्याच्या ठिकाणी दिनांक ३१.७.२००९ (म.नं.) रोजी बंद करुन विदर्भ प्रादेशिक विभागांतर्गत दिनांक **१/०८/२००९** पासून कार्यान्वित होतील यादृष्टीने मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प, पुणे यांनी आवश्यक ती सर्व तयारी करुन उपरोक्त कार्यालये दिनांक **१/०८/२००९** पासून कार्यान्वित करावीत.

१०.	**अधीक्षक अभियंता, घाटघर जलविद्युत प्रकल्प मंडळ, नाशिक व त्याअंतर्गत विभाग व उपविभाग वर्गीकरणाने उपलब्ध करुन देण्यात येत असल्याने त्यांच्या अधिपत्याखालील कार्यकारी अभियंता, घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प विभाग क्र.३, शहापूर व कार्यकारी अभियंता, नर्मदा विकास विभाग, नंदूरबार हे दोन विभाग व त्याखालील उपविभाग या कार्यालयातील गट क व ड वर्गातील कर्मचाऱ्यांचे अन्यत्र समावेशन होणाऱ्या कार्यालयाकडे** प्रलंबित निवृत्ती वेतन व न्यायालयीन प्रकरणे तसेच कर्मचाऱ्यांची सेवा विषयक प्रलंबित प्रकरणे त्यांचे मूळ सेवापुस्तकासह व इतर अभिलेखे इत्यादी अधीक्षक अभियंता, कोयना बांधकाम मंडळ, सातारा या कार्यालयाकडे सोपविण्याबाबतचे स्वयंस्पष्ट आदेश मुख्य अभियंता, कोयना प्रकल्प, पुणे यांनी निर्गमित करावेत त्याचप्रमाणे **सदर** कार्यालयांकडील कामे, तेथील हत्यारे, संयंत्रे व वाहने तसेच प्रलंबित लेखापरिक्षण अहवाल याबाबत देखील कार्यवाही करण्यात यावी व परिपूर्ण अहवाल शासनास पाठवावा.

अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर अंतर्गत कार्यकारी अभियंता, मध्यम प्रकल्प विभाग, अहमदनगर व त्याखालील तीन उपविभाग वर्गीकरणाने **उपलब्ध करुन देण्यात येत असल्याने या कार्यालयातील गट क व ड वर्गातील कर्मचाऱ्यांचे अन्यत्र समावेशन होणाऱ्या कार्यालयाकडे** प्रलंबित निवृत्ती वेतन व न्यायालयीन प्रकरणे तसेच कर्मचाऱ्यांची सेवा विषयक प्रलंबित प्रकरणे त्यांचे मूळ सेवापुस्तकासह व इतर अभिलेखे इत्यादी अन्य कार्यालयाकडे सोपविण्याबाबतचे स्वयंस्पष्ट आदेश कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा विकास महामंडळ, औरंगाबाद यांनी निर्गमित करावेत त्याचप्रमाणे **सदर** कार्यालयांकडील कामे, तेथील हत्यारे, संयंत्रे व वाहने तसेच प्रलंबित लेखापरिक्षण अहवाल याबाबत देखील कार्यवाही करण्यात यावी व परिपूर्ण अहवाल शासनास पाठवावा.

११.	स्थलांतरीत/वर्ग होणाऱ्या कार्यालयांतील सध्या कार्यरत असलेल्या गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांबाबत स्वतंत्रपणे आदेश काढण्यात येतील. घाटघर जलविद्युत प्रकल्प मंडळ, नाशिक या मंडळ कार्यालयातील क व ड संवर्गातील कर्मचाऱ्यांचे समावेशन अधीक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी, घाटघर जलविद्युत प्रकल्प मंडळ, नाशिक यांनी करावे.तसेच घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प विभाग क्र.२, चौंढे व त्याखालील उपविभागांतील क व ड संवर्गातील कर्मचाऱ्यांचे समावेशन अधीक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी, दक्षता पथक, मुंबई परिमंडळ, ठाणे यांनी करावे. मध्यम प्रकल्प विभाग, अहमदनगर व त्याखालील उपविभागांतील गट क व ड संवर्गातील कर्मचा-यांचे समावेशन अधीक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे यांनी करावे. वर्गीकरणामुळे वर्गीकृत होणाऱ्या कार्यालयांचा व गुण नियंत्रण मंडळ कार्यालयाचा आकृतीबंध हे वेगवेगळे असल्यामुळे काही पदे कमी प्रमाणात उपलब्ध होतील ही कमी पडणारी पदे यथावकाश उपलब्धतेनुसार उपलब्ध करुन देण्यात येतील. गट-क व गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांना पर्यायी नेमणूका शक्यतो त्याच महसुल विभागात, जिल्हयात देण्याबाबत शासनाचे प्रचलित नियमानुसार समायोजनाचे आदेश संबंधित कार्यालयाने दिनांक ३१.७.२००९ पूर्वी निर्गमित करावेत. गट क व ड कर्मचाऱ्यांचे समावेशन हे रिक्त पदांवर करण्यात येईल हयाबाबत दक्षता घ्यावी. तसेच अन्य प्रादेशिक विभागातील कर्मचाऱ्यांनी यापूर्वी विदर्भात बदली करण्याबाबत विनंती केली असल्यास त्यांना विदर्भात स्थलांतरीत होणाऱ्या कार्यालयात प्राधान्याने बदलीने पदस्थापना द्यावी.

१२.	शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.टीआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि.८ मार्च,१९८४ मधील तरतूदीनुसार संबंधीत मंडळ व विभाग कार्यालयांच्या अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

१३.	याप्रकरणी होणारा खर्च "मागणी क्र.आय-५ मुख्य लेखाशिर्ष ४७०१, मोठे व मध्यम प्रकल्पावरील भांडवली खर्च (८०) सर्वसाधारण (००१) संचालन व प्रशासन (योजनांतर्गत)" या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व मंजूर अनुदानातून भागवावा.

१४.	ज्याठिकाणी हेतुबदल होत आहे ती बाब लाक्षणिक पुरक मागणीद्वारे यथावकाश संबंधीत प्रकल्प कार्यासनाकडून (निवसं-३) विधान मंडळाच्या निदर्शनास आणण्यात येईल.

**१५.**	हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दि.१५/१०/९२ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार आणि नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३००/व्यय-१२, दिनांक १८.७.२००९ अन्वये प्राप्त झालेल्या मंजूरी नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक **२००९०७२४१८०१२८००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( प्र. प्र. गोसावी )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
मा.मंत्री (कृष्णा खोरे) यांचे स्वीय सहायक
मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व अधीक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी.
सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
सर्व जिल्हाधिकारी
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती)
सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
संगणक कार्यक्रम कक्ष , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
(कार्यालयांचे बदलाबाबत आवश्यक ती नोंद घ्यावी)

**प्रपत्र**

**शासन निर्णय क्र.-आढावा-२००९/(१२६/२००९)/निवसं-३/आ.(प्रशि.) मंत्रालय,मुंबई-४०००३२, दिनांकः २४ जुलै,२००९ चे सहपत्र.**

## अधीक्षक अभियंता गुण नियंत्रण मंडळ, नागपूर कार्यालयाची रचना

| **अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, नागपूर** | **अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, नागपूर** अंतर्गत नव्याने कार्यान्वित होणारे विभाग | **गुण नियंत्रण विभाग** अंतर्गत नव्याने कार्यान्वित होणारे उपविभाग |
|---|---|---|
| (अधीक्षक अभियंता, घाटघर जलविद्युत प्रकल्प मंडळ, नाशिक हे कार्यालय फिरवाफिरवीने वर्ग करून) | **(१) का.अ.,गुण नियंत्रण विभाग, अमरावती** (अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद अंतर्गत सध्या याच ठिकाणी,याच नावाने कार्यरत असलेला विभाग) | **१. गुण नियंत्रण उपविभाग, अमरावती.** (गुण नियंत्रण विभाग,अमरावती अंतर्गत सध्या याच ठिकाणी,याच नावाने कार्यरत असलेला उपविभाग) |
| | | **४. गुण नियंत्रण उपविभाग, दारव्हा** (गुण नियंत्रण विभाग,अमरावती अंतर्गत सध्या याच ठिकाणी,याच नावाने कार्यरत असलेला उपविभाग) |
| | | **५. गुण नियंत्रण उपविभाग, मोर्शि** (घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प विभाग क्र.२ चोंढे अंतर्गत सध्या कार्यरत असलेला घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प उपविभाग क्र.९, चोंढे हा उपविभाग वर्गीकरणाने उपलब्ध) |
| | | **६. गुण नियंत्रण उपविभाग, घाटंजी** (घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प विभाग क्र.२ चोंढे अंतर्गत सध्या कार्यरत असलेला घाटघर उदंचन जविप्र गुण नियंत्रण उपविभाग क्र.३ चोंढे हा उपविभाग वर्गीकरणाने उपलब्ध) |
| | **(२) का.अ.,गुण नियंत्रण विभाग, नागपूर** (अधीक्षक अभियंता, गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद अंतर्गत सध्या याच ठिकाणी,याच नावाने कार्यरत असलेला विभाग) | **१. गुण नियंत्रण उपविभाग, नागपूर** (गुण नियंत्रण विभाग, नागपूर अंतर्गत सध्या याच ठिकाणी,याच नावाने कार्यरत असलेला उपविभाग) |
| | | **२. गुण नियंत्रण उपविभाग, वर्धा.** (गुण नियंत्रण विभाग, नागपूर अंतर्गत सध्या याच ठिकाणी,याच नावाने कार्यरत असलेला उपविभाग) |
| | | **३. गुण नियंत्रण उपविभाग, अंबाडी (भंडारा)** (गुण नियंत्रण विभाग, नागपूर अंतर्गत सध्या याच ठिकाणी,याच नावाने कार्यरत असलेला उपविभाग) |
| | | **४. गुण नियंत्रण उपविभाग, तिरोडा** (घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प विभाग क्र.२ चोंढे अंतर्गत सध्या कार्यरत असलेला घाटघर उदंचन जविप्र उपविभाग क्र.१३, चोंढे हा उपविभाग वर्गीकरणाने उपलब्ध) |
| | **(३) का.अ.,गुण नियंत्रण विभाग, वाही (पवनी)** (अधीक्षक अभियंता, घाटघर जलविद्युत प्रकल्प मंडळ, नाशिक अंतर्गत का. अ., घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प विभाग क्र.२, चोंढे हे कार्यालय फिरवाफिरवीने वर्ग करून) | **१. गुण नियंत्रण उपविभाग, गोसीखुर्द** (गुण नियंत्रण विभाग, नागपूर अंतर्गत सध्या याच ठिकाणी याच नांवाने कार्यरत परंतु एक समुच्याने वाही येथे स्थलांतर) |
| | | **२. गुण नियंत्रण उपविभाग, तास, भिवापूर** (घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प विभाग क्र.२ चोंढे अंतर्गत सध्या कार्यरत असलेला जलविद्युत प्रकल्प सर्वेक्षण उपविभाग क्र.१, नाशिक हा उपविभाग वर्गीकरणाने उपलब्ध) |
| | | **३. गुण नियंत्रण उपविभाग, ब्रह्मपूरी** (अहमदनगर मध्यम प्रकल्प विभाग अहमदनगर अंतर्गत सध्या अस्तित्वात असलेला सिना प्रकल्प कालवा उपविभाग क्र.२, अहमदनगर हा उपविभाग वर्गीकरणाने उपलब्ध) |
| | | **४. गुण नियंत्रण उपविभाग, चकारा** (अहमदनगर मध्यम प्रकल्प विभाग अहमदनगर अंतर्गत सध्या अस्तित्वात असलेला सिना प्रकल्प कालवा उपविभाग क्र.१, शेवगांव हा उपविभाग वर्गीकरणाने उपलब्ध) |

| | | |
|---|---|---|
| | **(४) का.अ.,गुण नियंत्रण विभाग, अकोला**<br>(अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर अंतर्गत का.अ., मध्यम प्रकल्प विभाग, अहमदनगर हे कार्यालय फिरवाफिरवीने वर्ग करून) | **१. गुण नियंत्रण उपविभाग, अकोला**<br>(गुण नियंत्रण विभाग, अमरावती अंतर्गत सध्या याच ठिकाणी,याच नावाने कार्यरत असलेला उपविभाग) |
| | | **२. गुण नियंत्रण उपविभाग, देऊळगांव, मही.**<br>(गुण नियंत्रण विभाग, अमरावती अंतर्गत सध्या याच ठिकाणी,याच नावाने कार्यरत असलेला उपविभाग) |
| | | **३. गुण नियंत्रण उपविभाग, वाशिम**<br>(अहमदनगर मध्यम प्रकल्प विभाग अहमदनगर अंतर्गत सध्या अस्तित्वात असलेला ताजनापूर मध्यम प्रकल्प उपविभाग, शेवगांव हा उपविभाग वर्गीकरणाने उपलब्ध) |
| | | **४. गुण नियंत्रण उपविभाग, नांदुरा**<br>(यथावकाश उपलब्ध करुन देण्यात येईल) |
| | | **५. मृद परिक्षण उपविभाग, अकोला**<br>(अकोला पाटबंधारे .मंडळ, अकोला अंतर्गत अकोला पाटबंधारे विभाग, अकोला अंतर्गत सध्या याच ठिकाणी,याच नावाने कार्यरत असलेला हा उपविभाग वर्गीकरणाने उपलब्ध) |